**सपोर्ट टु नॅशनल पॉलिसीस फॉर अर्बन पॉवर्टी रिडक्शन या प्रकल्पांतर्गत प्राप्त निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

गृहनिर्माण विभाग,

शासन निर्णय क्रमांक-राआयो-२०११/प्र.क्र.-२६१/गृनिधो-२(सेल),

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :१४.११.२०११

**वाचा :** गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मूलन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्रमांक-पी-१७०१५ /१/२०११/एच ॲन्ड आर/एसएनपीयुपीआर, दिनांक ३०.३.२०११.

**शासन निर्णय :**

केंद्रीय गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मूलन मंत्रालयाने शहरी गरीबी निर्मुलनाच्या राष्ट्रीय कार्यक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता युनायटेड किंगडम स्थित डिपार्टमेंट ऑफ इंटरनॅशनल डेव्हलपमेंट या संस्थेच्या सहाय्याने "सपोर्ट टु नॅशनल पॉलिसीस फॉर अरबन पॉवर्टी रिडक्शन" हा प्रकल्प हाती घेतलेला आहे. सदर प्रकल्पांतर्गत केंद्रीय गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयात पॉलिसी ॲन्ड प्रोजेक्ट सपोर्ट युनिटची स्थापना करण्यात आली असून त्याद्वारे राज्य सरकार तसेच निवडक शहरांस राज्य कार्य नियोजन सूची (Plan of Action), झोपडपट्टीमुक्त शहर प्रकल्प तसेच शहरी गरीबी निर्मुलनाच्या व्यूहरचना करण्याकरीता मदत करण्यात येते. सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्रातील नांदेड-वाघाळा, नागपूर व ठाणे या शहरांची निवड करण्यात आली असून राजीव आवास योजनेंतर्गत झोपडपट्टीमुक्त शहर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरीता केंद्रीय गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाने त्यांच्या दि.३०.३.२०११ च्या ज्ञापनाद्वारे त्यामध्ये नमूद अटींची पूर्तता करण्याच्या अधिन नांदेड-वाघाळा, नागपूर व ठाणे या तीन शहरांकरीता प्रत्येकी रु.५८,०००/- या प्रमाणे रु.१,७४,०००/- इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. ज्ञापनाची प्रत संबंधीत महानगरपालिकांना केंद्र शासनाने अग्रेषित केली आहे. सदर निधी नांदेड-वाघाळा, नागपूर व ठाणे या नागरी स्वराज्य संस्थांस वितरीत करण्याकरीता या शासन निर्णयाद्वारे राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणास उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास यांचेमार्फत प्रस्तुत निधी अंमलबजावणी करणाऱ्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थास वितरीत करताना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी. तसेच ज्या प्रयोजनासाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध करुन दिला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे व सदर तरतूद केंद्र शासनाच्या निकषानुसार खर्च होईल याची दक्षता घेणे आवश्यक आहे. सदर रकमेचे वितरण MP-SIMS या शासनाच्या संगणक प्रणालीवर नोंदविण्याची जबाबदारीही प्राधिकरणावर राहील.

३. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणावर योजनेंतर्गत होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत केंद्र व राज्य शासनास सादर करणे बंधनकारक राहील. जर वितरीत केलेली रक्कम केंद्र शासनाने ज्या प्रयोजनासाठी वितरीत केली आहे त्या प्रयोजनासाठी वापरली नाही, तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यात येईल.

४. या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन/महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरिता /तपासण्याकरिता सादर करण्याची प्राधिकरणावर जबाबदारी असेल. सदर लेखाशिर्षकाचे दर महिन्याअखेरचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयातील लेख्याशी ठेवून त्याबाबतचा अहवाल शासनास दर महिनाअखेर सादर करण्यात यावा.

५.	या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्रमांक क्यू-३ मुख्य लेखाशिर्ष २२१६ गृहनिर्माण-८० सर्वसाधारण १०३ - गृहनिर्माण मंडळे/महामंडळे इ.ना. सहाय्य (०६)(०१) राजीव आवास योजना ३१, सहाय्य अनुदाने (वेतनेतर) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (दत्तमत) (२२१६ २६३७) या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

६.	हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.११३/१४६१, दि.१६.९.२०११ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३७४/व्यय-३, दि.११.१०.२०११ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक (२०१११०२५१६३०३९००१) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(प्र.ल.पाठक)
शासनाचे उप सचिव.

प्रत,

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६) मुख्य अभियंता-२, राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
७) प्रधान सचिव (गृहनिर्माण) तथा अध्यक्ष, झोपडपट्टीमुक्त शहर तांत्रिक कक्ष, वांद्रे (पूर्व), मुंबई.
८) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई.
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, नागपूर
१०) वित्त नियंत्रक / मुख्य अभियंता-१, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे, मुंबई-४०० ०५१.
१२) निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३) वित्त विभाग (व्यस-३ कार्यासन, अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग (संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)
१६) सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१७) उप सचिव / सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) अवर सचिव / रोखशाखा व आहरण व संवितरण अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९) निवड नस्ती / गृनिधो-२ (सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.